**जन्म-मृत्यू नोंदणीचे अभिलेख जतन करण्यासाठी ३०४ स्टील कपाटांची खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः खरेदी-२०१६/प्र.क्र. ४०२/आरोग्य-८**
नविन मंत्रालय, गोकुळदास तेजपाल रुग्णालय कंपांउंड,
कॉम्पलेक्स बिल्डींग, १० वा मजला, मुंबई ४००००१
दिनांक: २४ नोव्हेंबर, २०१६

**संदर्भ-**

१) सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक संआसे/खरेदी कक्ष/टे-५/स्टिल कपाट/आमाजिआ, दिनांक २१.०९.२०१६
२) उपसंचालक, आरोग्य सेवा (आमाजिआ), पुणे यांचे पत्र क्रमांक आमाजिआ/कक्ष ८५ड/भांडार/नस्ती क्र.१७/स्टिल कपाट खरेदी/१०४२०-१०४२२/१६,दिनांक ०१.०९.२०१६

**प्रस्तावना -**

उपसंचालक, आरोग्य सेवा (आमाजिया), पुणे हे कार्यालय सांख्यिकी विभाग, जन्म-मृत्यू नोंदणी व विवाह नोंदणीचे राज्यस्तरीय कार्यालय आहे. सदरहू कार्यालयांतर्गत जन्म-मृत्यू नोंदणी कामकाजासंदर्भात पर्यवेक्षण व संनियंत्रण करण्यात येते. भारत सरकारच्या सन १९६९ च्या तसेच महाराष्ट्र शासनाच्या सन २००० च्या जन्म-मृत्यू नोंदणी अधिनियमातील तरतुदीनुसार जन्म-मृत्यू नोंदणी माहितीचे अभिलेख कायमस्वरुपी जतन करणे व सुस्थितीत ठेवणे बंधनकारक आहे. सदरहू अभिलेख जतन करुन ठेवण्यासाठी राज्यातील पंचायत समिती व जिल्हा परिषद कार्यालयांकडून ३०४ स्टील कपाटांची मागणी करण्यात आली आहे. त्या अनुषंगाने ३०४ स्टील कपाटांची खरेदी करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याबाबत संदर्भीय पत्रान्वये प्रस्ताव प्राप्त झाला आहे. त्यानुसार स्टील कपाट खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

आरोग्य सेवा संचालनालयाने संदर्भीय दिनांक २१.०९.२०१६ च्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने जन्म-मृत्यू नोंदणीचे अभिलेख जतन करण्यासाठी राज्यातील जिल्हा परिषद व पंचायत समिती कार्यालयातील सांख्यिकी विभागाकरिता ३०४ स्टील कपाटांची खरेदी करण्यासाठी निविदा प्रक्रिया करण्यास खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

१) स्टील कपाटांची आवश्यकता/मागणी याची शहानिशा/खातरजमा करण्यात यावी.
२) सदरहू खरेदीसाठी होणारा खर्च "२२१०, वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य- पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- राज्य योजनांतर्गत योजना - (०१) (०२) जीवनविषयक आकडेवारी माहिती केंद्राचा दर्जा वाढविणे - २१ पुरवठा व सामग्री (२२१० १०९१)" या लेखाशिर्षांअंतर्गत सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.
३) स्टील कपाटांचे तांत्रिक विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी व त्यानंतरच या बाबींच्या खरेदीसाठी निविदा प्रसिध्द करण्यात यावी.

४) शासन निर्णय, उद्योग, उर्जा व कामगार विभाग, क्रमांक भांखस २०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक ३० ऑक्टोंबर, २०१५ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची नियमपुस्तिका यामधील तरतुदीनुसार विहित खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

५) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-दोन मधील अ.क्र.४, नियम क्रमांक ७ समोरील स्तंभ क्रमांक ६ येथील अटींची पुर्तता करण्यात यावी.

६) निविदा प्रक्रिया पुर्ण झाल्यांनतर केंद्रीय खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमित करण्यात यावेत.

**२.** शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग दोन मधील अ.क्र.४, नियम क्र. ७ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानूसार सदरहू प्रस्तावास मान्यता देण्यात येत आहे.

**३.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१११८१७४५५६९२१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ganesh Sumant Kulkarni

Digitally signed by Ganesh Sumant Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ganesh Sumant Kulkarni
Date: 2016.11.24 16:13:05 +05'30'

( ग.सु.कुलकर्णी )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
२) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
३) सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
४) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन) , आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
५) उपसंचालक, आरोग्य सेवा ( आमाजिआ), पुणे
६) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई
७) महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), नागपूर
८) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
९) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
११) निवडनस्ती (आरोग्य-८)